नागरी बॅन्कांनी दिलेले धनादेश/
धनाकर्ष प्रतिभूती म्हणून
स्विकारण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक मुंविनि १०९०/१३५८/विनियम,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २३ जानेवारी १९९०.

वाचावे:- सर्वसाधारण वित्तीय नियम, १९८३ मधील नियम २७४ मधील विवरण-पत्रांतील अनुक्रमांक [नऊ] समोरील केंद्र शासनाने केलेली तरतूद.

परिपत्रक

ज्या बॅन्कांचे खेळते भांडवल रु.५ कोटीपेक्षा अधिक आहे अशा मोठ्या नागरी बॅन्कांनी दिलेले धनादेश किंवा धनाकर्ष आणि "अ", "ब" किंवा "क" वर्गातील मध्यवर्ती सहकारी बॅन्का व बिगर-अनुसूचित राज्य सहकारी बॅन्का यांनी दिलेले धनादेश किंवा धनाकर्ष प्रतिभूतीचा [ SECURITY ] एक प्रकार म्हणून स्विकारण्यास, खालील अटींच्या अधीन हरकत नाही.

[१] खाजगी ठेकेदार किंवा पुरवठेदार यांनी दिलेले धनादेश किंवा धनाकर्ष करार करण्यासाठी प्रथमत: स्विकारण्यात यावे.

[२] खाजगी ठेकेदारांनी किंवा पुरवठादारांनी दिलेले धनादेश किंवा धनाकर्ष सक्षम प्राधिका-यांकडे प्राप्त होताच त्यांनी ते वटविण्याची व रोखीकरण करण्याची कार्यवाही तात्काळ करावी व धनादेशाचे किंवा धनाकर्षाचे रोखीकरण झाल्या-नंतरच संबंधीत ठेकेदारांना किंवा पुरवठादारांना ठेका देण्याबाबत संबंधीत सक्षम प्राधिका-यांनी योग्य ती कार्यवाही करावी.

२. राष्ट्रीयकृत बॅन्कांनी दिलेले धनादेश किंवा धनाकर्ष प्रतिभूतीचा एक प्रकार म्हणून वरील अटींच्या अधीन राहून राज्य शासकीय विभागाने किंवा कार्यालयाने स्विकार-ण्याची सध्याची पध्दत यापुढेही चालू ठेवावी.

३. ठेका देण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याने किंवा पुरवठ्याची मागणी करण्यास

[कृ.मा.प.]

शामुमु-रोटा-विवि-एच-११५३[१०,०००+१०-१-९०]

सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि.ह. पत्की,
कक्ष अधिकारी,
वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल [लेखापरीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल [लेखापरीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
x प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,
मादाम कामा रोड, मुंबई,
मंत्रालय विभागातील सर्व सचिव,
सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग,
वित्त विभागातील अन्य कार्यासने,
वित्त विभागातील सर्व अधिकारी.

x पत्राद्वारे.

एच-११५३[१०,०००+१०-१-९०]-३